**मोटार वाहन विभागातील प्रादेशिक परिवहन अधिकारी पदावर पदोन्नती व पदस्थापना**

# महाराष्ट्र शासन
## गृह (परिवहन) विभाग

शासन आदेश क्रमांक : एमव्हीडी-०९१४/प्र.क्र.२८६/परि-४
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१५.

वाचा :- सा.प्र.वि. पत्र क्रमांक बीसीसी-२००१/१८८७/प्र.क्र.६४/०१/१६-ब, दि.०१/०४/२००८

**शासन आदेश :-**

मोटार वाहन विभागातील उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ संवर्गातील खालील अधिकारी यांना प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ या संवर्गातील ( वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० + ग्रेड पे ६६००) रिक्त पदावर तात्पुरत्या स्वरुपात तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदस्थापना रकाना ५ मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या कार्यालयात करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसूली विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | श्री. डी.एन. मनवर | खुला | औरंगाबाद | प्रा.प.का, नांदेड |

२. सदर अधिकारी यांची तदर्थ पदोन्नती असल्याने सेवा जेष्ठतेकरिता ग्राह्य धरली जाणार नाही. सदरची पदोन्नती मा. मुंबई उच्च न्यायालयातील रिट याचिका क्र. ८४५२/२००४ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नती ११ महिन्यांकरिता देण्यात येत असून त्यानंतर सदर पदोन्नती चालू ठेवावयाची असल्यास ११ महिन्याच्या कालावधीनंतर त्या-त्या वेळी खंड देण्यात येईल.

४. सदर अधिकारी यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना, महसुली विभाग वाटप नियमावलीसंदर्भात सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि. २८/०४/२०१५ व १६/०७/२०१५ मधील तरतुदीनुसार करण्यात आली आहे.

५. संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी वरील अधिकारी यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच पदोन्नतीवरील अधिकारी यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार कार्यालय प्रमुखांच्या सल्ल्याने अन्य अधिका-याकडे सोपवून तात्काळ कार्यमुक्त व्हावे व पदोन्नतीच्या ठिकाणी तात्काळ कार्यभार स्विकारावा.

६. सदर पदोन्नतीनंतर संक्रमण काळात कोणत्याही प्रकारची रजा मंजूर होणार नाही.

७. सदर आदेश प्राप्त होताच वरील अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व रुजू झाल्याचा दिनांक परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांना कळवावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८२७१४३६१२१४२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prakash K Sabale

Digitally signed by Prakash K Sabale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash K Sabale
Date: 2015.08.27 15:07:27 +05'30'

**( प्रकाश साबळे )**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी.
४) सर्व उप प्रादेशिक परिवहन कार्यालय.
५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७) संबंधीत उप प्रादेशिक परिवहन अधिकारी (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
८) निवडनस्ती-परि-४.